**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ. पट्टीवडगांव - ९ गांवे (ता. अंबाजोगाई, जि. बीड) प्रादेशिक पाणीपुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१८/प्र.क्र.१८८/पापु-१९**

७ वा माळा, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २३ जानेवारी, २०१९

**वाचा**

१) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बीड यांचे पत्र जा.क्र.मजीप्राविबीड/तांशा-३/१८८८/२०१८, दि. २८ नोव्हेंबर, २०१८
२) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बीड यांचे तांत्रिक मंजूरी आदेश क्र. मजीप्रामंविबीड/तांशा/१८८९/२०१८, दि. २८ नोव्हेंबर, २०१८
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
४) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७
५) शासन परिपत्रक क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.१८६/पापु-१९, दिनांक ०६ ऑगस्ट, २०१८

**प्रस्तावना:-**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ. पट्टीवडगांव - ९ गांवे (ता. अंबाजोगाई, जि. बीड) प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र. १ येथील पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे. सदर योजनेच्या रु.२११.७८ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बीड यांनी संदर्भाधीन क्र.२ येथील आदेशान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तसेच अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखालील तांत्रिक समितीच्या दि.३० ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या बैठकीत सदर योजना पुनरुज्जीवित करणेबाबतच्या सविस्तर प्रकल्प अहवालास मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार सदर योजनेच्या रू.२११.७८ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौ. पट्टीवडगांव - ९ गांवे (ता. अंबाजोगाई, जि. बीड) ही बंद असलेली प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याबाबतच्या रु.२११.७८ लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी अकरा लाख अठ्ठ्याहत्तर हजार फ़क्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर योजनांच्या पुनरुज्जीवनाची, पुढील देखभाल दुरुस्तीची, संचलन व सनियंत्रणाची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

II. योजनेची कामे विहीत पध्दतीने ई- निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्वीकृत करु नयेत. योजनेचे काम प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

III. योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

IV. योजनेत समाविष्ट गावांसोबत ठोक स्वरुपात पाणी घेणेबाबत करारनामा करण्यात यावा. करारनामा केल्यानंतर गावाने पाणी घेण्यास नकार दिल्यास त्यांचेकडून ७५ टक्के पाणीपट्टी वसूल करण्यात यावी. याबाबत ग्रामस्थांना निविदा प्रक्रियेच्या अगोदरच कल्पना देण्यात यावी.

V. संदर्भाधीन क्र.५ येथील शासन परिपत्रकातील सुचनानूसार योजनेत समाविष्ट सर्व घरमालकांकडून मीटरजोडणी घेणेबाबत व पाणीपट्टी भरणेबाबत विहित नमुन्यात हमीपत्र घेण्यात यावीत.

VI. पाणीपुरवठा करण्यासाठी प्रत्येक गावाकरिता स्वतंत्र व्यवस्था करावी, जेणेकरुन पाणीपट्टीची रक्कम न भरल्यामुळे एखाद्या गावाचा पाणीपुरवठा बंद करावयाचा झाल्यास कोणतीही अडचण येणार नाही.

VII. योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने **प्रति नळजोडणी वार्षिक किमान रु.१५००/- इतका पाणी पट्टीचा दर** निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करावी.

VIII. योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

IX. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

X. कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

XI. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील दि.०७ मे, २०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

XII. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेचे पुनरुज्जीवन हाती घेण्यात यावे.

XIII. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

XIV. योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर यांची राहील.

२. सदर योजनांवर होणारा खर्च मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२७) बंद पडलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन (२२१५ ९९५१)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२२१११३३९०३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2019.01.23 14:01:06 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) जिल्हाधिकारी, बीड
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड
७) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
८) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
९) मुख्य/अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, औरंगाबाद
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
११) कार्यासन पापु-०४ व पापु-२० पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती (पापु-१९)